**खाजगी सुरक्षा यंत्रणा अधिनियम, २००५ अन्वये महाराष्ट्रातील खाजगी सुरक्षा यंत्रणांना परवाना देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - पीएसए-१२१८/प्र.क्र.३६८/विशा-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: ११ डिसेंबर, २०१९.

वाचा : खाजगी सुरक्षा यंत्रणा अधिनियम, २००५

**प्रस्तावना :-**

खाजगी सुरक्षा यंत्रणांचे विनियमन करण्यासाठी केंद्र सरकारने खाजगी सुरक्षा यंत्रणा कायदा, २००५ संमत केला आहे. सदर कायद्याच्या अनुषंगाने खाजगी सुरक्षा यंत्रणांना परवाना देण्याचे अधिकार राज्य शासनास दिले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र शासनाने, दि.२३/०२/२००७ रोजी अधिसूचना निर्गमित केली असुन, खाजगी सुरक्षा यंत्रणा अधिनियम, २००५ या कायद्याच्या अंमलबजावणीसाठी नियंत्रक प्राधिकारी म्हणून प्रधान सचिव (विशेष) यांना प्राधिकृत केले आहे.

खाजगी सुरक्षा यंत्रणांना देण्यात येणाऱ्या परवाना प्रक्रियेमध्ये सुलभता आणण्यासाठी केंद्र शासनाने सदर परवाना ऑनलाईन पध्दतीने देण्यासाठी PSARA या सॉफ्टवेअरची निर्मिती केली आहे. सदर सॉफ्टवेअरचे अनावरण दि.२४/९/२०१९ रोजी मा. केंद्रीय गृहमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिल्ली येथे करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने, महाराष्ट्रातील खाजगी सुरक्षा यंत्रणांना परवाना देण्यासाठी केंद्र सरकारने निर्माण केलेल्या PSARA Online Application Software चा वापर ऑनलाईन होण्या संदर्भात केंद्र सरकारला कळविले होते. केंद्र सरकारने महाराष्ट्र राज्यासाठी दि.२८/११/२०१९ रोजी PSARA Online Application Software खाजगी सुरक्षा यंत्रणांना परवाना देण्यासाठी उपलब्ध केले आहे.

सदर Online Application Software च्या माध्यमातून खाजगी सुरक्षा यंत्रणांचे परवाना मिळण्यासाठीचे अर्ज नियंत्रक प्राधिकारी तथा प्रधान सचिव (विशेष) यांच्याकडे प्राप्त होत आहेत. सदर अर्जाच्या अनुषंगाने खाजगी सुरक्षा यंत्रणाच्या कार्यालयीन जागा व संबंधीत अर्जदारांची चारित्र्य पडताळणी पोलीसांमार्फत विहीत कालमर्यादेत होणे आवश्यक आहे.

**शासन परिपत्रक :-**

उपरोक्त बाब विचारात घेता महाराष्ट्रातील खाजगी सुरक्षा यंत्रणांना परवानगी देण्यासंदर्भात नियंत्रक प्राधिकारी तथा प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांच्याकडून पोलीस पडताळणीसाठी प्राप्त होणाऱ्या संदर्भावर पुढील प्रमाणे विनाविलंब कार्यवाही करण्यात यावी.

१. खाजगी सुरक्षा यंत्रणेच्या परवानगीबाबत नियंत्रक प्राधिकारी तथा प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांच्याकडे प्राप्त झालेला अर्ज, अर्जदाराच्या चारित्र्य व जागेच्या पडताळणीसाठी ई-मेल द्वारा स्थानिक पोलीस ठाणे यांच्याकडे पाठविला जाईल.
२. स्थानिक पोलीस ठाणे यांनी उपरोक्त पध्दतीने प्राप्त झालेल्या अर्जाच्या संदर्भात आवश्यक ती पोलीस पडताळणी करुन त्याबाबतचा अहवाल ई-मेल द्वारे ०७ दिवसांचे आत शासनास सादर करणे बंधनकारक राहील.
३. पोलीस पडताळणी अहवाल विहित कालावधीत शासनास सादर करण्याची जबाबदारी संबंधीत पोलीस ठाण्याच्या प्रभारी पोलीस अधिकाऱ्यांवर राहील.

४. सदर पोलीस पडताळणी अहवाल विहीत कालमर्यादेत (०७ दिवसांत) सादर न केल्यास त्याबाबत पोलीस अहवाल आक्षेपार्ह नाही असे गृहीत धरुन परवाना देण्यासंदर्भातील पुढील योग्य ती कार्यवाही करण्यात येईल. तसेच या संदर्भातील सर्व जबाबदारी संबंधीत पोलीस ठाण्याच्या प्रभारी पोलीस अधिकाऱ्याची राहील

५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस आयुक्त, मुंबई यांनी उपरोक्त नमूद सुचनांच्या अनुषंगाने आपल्या कार्यक्षेत्रातील सर्व पोलीस घटक तसेच सर्व स्थानिक पोलीस ठाणे यांना योग्य ते आदेश त्यांचे स्तरावरुन निर्गमित करावेत.

उपरोक्त सर्व सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१२१११११५२२९२०२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Damodar Patil

Digitally signed by Vijay Damodar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay Damodar Patil
Date: 2019.12.11 11:55:51 +05'30'

**( विजय पाटील )**
शासनाचे उप सचिव

**प्रत-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. पोलीस आयुक्त, मुंबई,
३. सर्व पोलीस आयुक्त (पोलीस आयुक्त, मुंबई वगळून),
४. सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
५. सर्व पोलीस अधिक्षक,
६. निवडनस्ती (विशा-४).